जलसंपदा विभागाच्या अधिपत्त्याखाली सर्व महामंडळांतर्गत निविदांमध्ये समान अटी व शर्ती निश्चित करण्यासाठी अभ्यासगट स्थापन करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्र.निविदा११०९/प्र.क्र.६३१/०९/मोप्र-१**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक:- २७ मार्च, २०१७

वाचाः शासन निर्णय क्र. निविदा ११०९/(६३१/२००९)/मोप्र-१; दि. ३०/११/२००९

**प्रस्तावना:-**

जलसंपदा विभागाच्या सर्व महामंडळाअंतर्गत प्रमाण निविदा कागदपत्रांमध्ये(Standard Bid Document) समान अटी व शर्तीसह सारखेपणा आणण्यासाठी तसेच दरसुचीमध्ये अंतर्भुत नसलेल्या बाबींचे दर ठरविण्यासाठी काही मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याकरिता शासन निर्णय क्र. निविदा ११०९/(६३१/२००९)/मोप्र-१; दि. ३०/११/२००९ अन्वये श्री.ह. य. कोळवले, तत्कालीन कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली एक अभ्यासगट स्थापन करण्यात आला होता. सदर अभ्यासगटाने दि. १/२/२०१० रोजीच्या पत्रान्वये विषयांकित प्रकरणी शासनास अहवाल सादर केला आहे. तथापि,मागील काही वर्षात निविदा प्रक्रियेमध्ये, कालानुरुप तसेच तंत्रज्ञान विकसित झाल्याने, मोठया प्रमाणात बदल झाल्याने आता याबाबत नव्याने कार्यवाही करणे गरजेचे आहे.

या अनुषंगाने प्रस्तावित करणेत येते की प्रत्येक विभागाने निविदा विषयक काम करणेपेक्षा प्रत्येक महामंडळात एक निविदा कक्ष ठेवावा. प्रत्येक विभागाने त्यांचेकडील कामाची DTP मंजूर करुन महामंडळाकडील निविदा कक्षाकडे पाठवावी व या कक्षाने सर्व ई- निविदा प्रक्रिया राबवून कामाचे आदेश निर्गमित करेपर्यंतची सर्व कार्यवाही करावी. ही पध्दत मध्यप्रदेश मध्ये कार्यरत आहे. तीचे पुढील फायदे आहेत : जादा पारदर्शकता, एकसारखेपणा, Online EMD, Tender fee घेणे सोपे, सर्वात महत्वाचे म्हणजे अनेक वेळा निविदा विषयक तक्रारीमध्ये तांत्रिक अधिकाऱ्यांचा खूप वेळ जातो. काही अधिकाऱ्यांना जाणीवपुर्वक तक्रार करुन मानसिक त्रास दिला जातो. तसेच निविदा कालावधीत अभ्यागतांची संख्याही वाढते. तथापि, वरील पद्धत अवलंबविल्याने कार्यालयातील अधिकाऱ्यांना तांत्रिक कामावर व क्षेत्रिय कामावर लक्ष देणेस अधिक वेळ मिळेल तसेच काही आस्थापना कमी करणे शक्य होईल, निविदा विषयक सर्व माहिती एकाच ठिकाणी उपलब्ध होईल.

त्यानुसार सर्व महामंडळाअंतर्गत प्रमाण निविदा कागदपत्रांमध्ये(Standard Bid Document) समान अटी व शर्तीसह सारखेपणा आणण्यासाठी तसेच दरसुचीमध्ये अंतर्भुत नसलेल्या बाबींचे दर ठरविण्यासाठी काही मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याच्या अनुषंगाने समिती गठीत करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्याअनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

जलसंपदा विभागाच्या सर्व महामंडळाअंतर्गत प्रमाण निविदा कागदपत्रांमध्ये (Standard Bid Document) समान अटी व शर्तीसह सारखेपणा आणण्यासाठी तसेच दरसुचीमध्ये अंतर्भुत नसलेल्या बाबींचे दर ठरविण्यासाठी काही मार्गदर्शक तत्वे निश्चित तयार करण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे त्रिसदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कार्यालयाचे नाव | पद |
|---|---|---|---|
| १. | श्री.सं.दे. कुलकर्णी | मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा,पुणे. | अध्यक्ष |
| २. | श्री. सं.कृ.घाणेकर | मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा,अमरावती. | सदस्य |
| ३. | श्री. ह. तु. धुमाळ | अधीक्षक अभियंता , पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे | सदस्य सचिव |

उपरोक्त प्रमाणे गठीत केलेल्या समितीने प्रस्तावनेत नमुद केलेल्या सर्व बाबींचा परामर्श घेऊन आपला अहवाल दि.३०/४/२०१७ पर्यंत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२९१२४३५०५१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2017.03.29 12:47:49 +05'30'

**( शरद दाभाडकर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३)मा.मंत्री(जलसंपदा)यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री(जलसंपदा)यांचे स्वीय सहायक.
५) मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य(सर्व)
६ )प्रधान सचिव(ज.स.प्र. व विकास) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
७) सचिव(ज.सं. व लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) महालेखापाल १ व २ महाराष्ट्र राज्य(लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
९) सर्व सह सचिव,उप सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०) संचालक,लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) आ.वि.स. व उ.स.,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२) सर्व कार्यकारी संचालक,जलसंपदा विभाग.
१३) सर्व मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग.
१४) सर्व अधिक्षक अभियंता,जलसंपदा विभाग.
१५) सर्व कार्यकारी अभियंता,जलसंपदा विभाग.
१६)मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.